अभिमत विद्यापीठातील व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्तीचे सुत्र विहित करण्याकरीता तज्ञ समिती पूनर्गठीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## उच्च व तंत्र शिक्षण विभाग
**शासन शुध्दीपत्रक क्र.सीटीसी-२०२०/प्र.क्र.२३ (भाग-३)/तांशि-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १८ जानेवारी, २०२२.

**वाचा :-** १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.सीटीसी-२०२०/प्र.क्र.२३/तांशि-४, दि.०७ डिसेंबर, २०२१.
२) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.२/तंशिस/एनजीसी /याचिका / २०२१/०४, दि.०४ जानेवारी, २०२२.

**शासन शुध्दीपत्रक :-**

अभिमत विद्यापीठातील व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्तीचे सर्वसमावेशक सुत्र विहित करुन शासनास शिफारस करण्याकरीता संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये तज्ञ समिती पूनर्गठीत करण्यात आली होती. सदर शासन निर्णयातील परिच्छेद ४ मध्ये समितीचे अध्यक्ष व सदस्य यांना दयावयाच्या बैठकीचे भत्ते व अनुषंगिक भत्ते यामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

१) समितीचे मा.अध्यक्ष यांना रु.५,०००/- ऐवजी रु.१०,०००/- प्रति बैठक एवढा बैठक भत्ता मान्य करण्यात येत आहे.
२) तसेच समिती सदस्य यांना रु.५,०००/- ऐवजी रु.७,५००/- प्रति बैठक एवढा बैठक भत्ता मान्य करण्यात येत आहे.

२. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आलेले असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०१०६१४४७३३६००८ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by NITIN JYOTINATH GHIRATKAR
Date: 2022.01.18 14:44:17 +05'30'

**( नि.ज्यो.घिरटकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

४) मा.न्या.श्री.एम.एन.गिलानी (निवृत्त) तथा माजी अध्यक्ष, शुल्क नियामक प्राधिकरण, नागपूर*.
५) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण संचालनालय,म.रा.,मुंबई.
६) संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, पुणे.
७) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई.
८) डॉ.आर.एस.माळी, निवृत्त कुलगुरु, कवयित्री बहिणाबाई चौधरी उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव तथा माजी सदस्य, शुल्क नियामक प्राधिकरण, नाशिक*.
९) श्री.संजय पानसे, सनदी लेखापाल, माजी सदस्य शुल्क नियामक प्राधिकरण, मुंबई*.
१०) निवडनस्ती (तांशि-४).

*पत्राने.